**शालेय पोषण आहार योजनेंतर्गत अन्न शिजविण्याच्या दरामध्ये सुधारणा करणेबाबत ... (सन २०१८-१९)**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शापोआ-२०१८/प्र.क्र.२५०/एस.डी.३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ०५ फेब्रुवारी, २०१९

**वाचा:-**

१) केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना २००६.
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्रमांक शापोआ-२०१०/प्र.क्र.१८/ प्राशि-४, दिनांक ०२ फेब्रुवारी, २०११.
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्रमांक शापोआ-२११६/प्र.क्र.२००/एस.डी.३, दिनांक २७ ऑक्टोबर, २०१६.
४) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक F. No.१-२/२०१८-Desk (MDM), दि.१५ नोव्हेंबर, २०१८

**प्रस्तावना :-**

राज्यामध्ये शालेय पोषण आहार (Mid-Day Meal) ही योजना इ.१ ली ते ८ वी च्या विद्यार्थ्यांसाठी राबविण्यात येते. सदर योजनेंतर्गत इ.१ ली ते ५ वी या प्राथमिक वर्गातील प्राथमिक विद्यार्थ्यांसाठी ४५० उष्मांक आणि १२ ग्रॅम प्रथिने युक्त तसेच इ.६ वी ते ८ वी या उच्च प्राथमिक वर्गातील विद्यार्थ्यांसाठी ७०० उष्मांक आणि २० ग्रॅम प्रथिने युक्त आहार देण्यात येतो. या योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून प्रतिदिन प्रति विद्यार्थी प्राथमिक वर्गासाठी १०० ग्रॅम आणि उच्च प्राथमिक वर्गासाठी १५० ग्रॅम तांदूळ पुरविण्यात येतो.

केंद्र शासनाने दि.०१/०७/२०१६ च्या आदेशान्वये सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी सन २०१५-१६ च्या अन्न शिजविण्याच्या दरात ७% वाढ करण्याचे निर्देश दिलेले होते. यानुसार संदर्भाधिन दि.२७/१०/२०१६ च्या शासन निर्णयान्वये अन्न शिजविण्याच्या दरासाठीची (Cooking Cost) प्रति दिन प्रति लाभार्थी आहार खर्च मर्यादा प्राथमिक वर्गासाठी (१ ली ते ५ वी) रु.४.१३/- आणि उच्च प्राथमिक वर्गासाठी (इ.६ वी ते ८ वी) रु.६.१८/- त्याप्रमाणे निश्चित करण्यात आलेली होती. केंद्र शासनाने संदर्भाधिन दि.१५/११/२०१८ च्या आदेशान्वये सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी सन २०१६-१७ च्या अन्न शिजविण्याच्या दरात ५.३५ % दरवाढ मंजूर केली आहे. त्यानुसार संदर्भाधिन दि.२/२/२०११ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार सदर दरवाढ लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१) शालेय पोषण आहार योजनेंतर्गत प्राथमिक तसेच उच्च प्राथमिक वर्गातील विद्यार्थ्यांना खालीलप्रमाणे आहाराचा पुरवठा करण्यास तसेच त्यासाठी सुधारित दरास मान्यता देण्यात येत आहे.

| लाभार्थी गट<br>शा | आहाराचे प्रमाण | प्रतिदिन प्रति लाभार्थी आहार खर्च मर्यादा (रु) |
|---|---|---|
| प्राथमिक (१ ली ते ५ वी) | ४५० उष्मांक आणि १२ ग्रॅम प्रथिनेयुक्त आहार | **४.३५** |
| उच्च प्राथमिक (६ वी ते ८ वी) | ७०० उष्मांक आणि २० ग्रॅम प्रथिनेयुक्त आहार | **६.५१** |

२) शालेय पोषण आहार योजनेंतर्गत ग्रामीण भागामध्ये तांदूळाबरोबरच इतर धान्यादी मालाचा पुरवठा शाळेमध्ये करण्यात येतो. सदर धान्यादी मालापासून आहार बनविण्यासाठी प्राथमिक आणि उच्च प्राथमिक लाभार्थ्यांसाठी निश्चित करण्यात आलेल्या आहार खर्चाची विभागणी खालीलप्रमाणे करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**ग्रामीण भागातील आहार खर्चाची विभागणी**

| लाभार्थी | अनुज्ञेय आहार खर्च (रु.) | धान्यादी माल पुरविण्यासाठी खर्च (रु.) | इंधन आणि भाजीपाला यासाठी लागणारा खर्च (रु.) |
|---|---|---|---|
| **प्राथमिक** | रु. ४.३५/- | रु. २.७८/- | रु. १.५७/- |
| **उच्च प्राथमिक** | रु.६.५१/- | रु.४.१६/- | रु.२.३५/- |

३) या योजनेमध्ये शहरी भागामध्ये म्हणजे महानगरपालिका, नगरपालिका क्षेत्रामध्ये स्वयंसेवी संस्था / बचत गट यांचेमार्फत शिजवलेल्या तयार आहाराचा पुरवठा शाळांमध्ये विद्यार्थ्यांना करण्यात येतो. शहरी भागात केंद्रीय स्वयंपाकगृह प्रणालीचा वापर करुन तयार आहाराचा पुरवठा करण्यात येत असल्याने शहरी भागामध्ये शालेय पोषण आहार पुरवठा करणाऱ्या यंत्रणेस खालीलप्रमाणे आहार खर्चाचे अनुदान अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**शहरी भागातील आहार खर्चाची विभागणी**

| लाभार्थी गट | अनुज्ञेय आहार खर्च (रु.) | तयार आहाराचा पुरवठा करणाऱ्या यंत्रणेस अदा करावयाचे अनुदान (रु.) |
|---|---|---|
| **प्राथमिक** | रु. ४.३५/- | रु. ४.३५/- |
| **उच्च प्राथमिक** | रु. ६.५१/- | रु. ६.५१/- |

४) सदरचे सुधारित दर दिनांक ०१ एप्रिल, २०१८ पासून लागू राहतील.

५) दिनांक २७ ऑक्टोबर, २०१६ च्या शासन निर्णयातील दरानुसार अन्न शिजविणाऱ्या यंत्रणांची देयके अदा केली असल्यास जिल्हास्तर / गटस्तरावर उपलब्ध माहितीच्या आधारे फरकाची परिगणना करुन

फरकाची रक्कम तात्काळ संबंधितांना अदा करण्याची कार्यवाही करावी. याबाबत आवश्यक आदेश शिक्षण संचालक (प्राथमिक) यांचे स्तरावरुनही निर्गमित करण्यात यावे.

६) सदरचा शासन निर्णय नियोजन आणि वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनुक्रमे अनौपचारीक संदर्भ क्रमांक २५३/१४७१, दिनांक ०५/१२/२०१८ व क्रमांक ९९२/१८/व्यय-५, दिनांक १३/१२/२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१९०२०५१२०७५३००२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suvarna Siddharth Kharat

Digitally signed by Suvarna Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=065279b98828b1456ad0d62a97fa45eee948af8abe5a27104d4e132c5bd1d93a, cn=Suvarna Siddharth Kharat
Date: 2019.02.05 12:09:35 +05'30'

**(डॉ.सुवर्णा खरात)**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४. सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
६. सर्व मा. संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८. मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९. मा.आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
११.शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई/नागपूर
१४.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१५.शिक्षणाधिकारी (बृहन्मुंबई), बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
१६.शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)
१७.नियोजन विभाग (१४७१),मंत्रालय, मुंबई
१८. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
१९.शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
२०.निवड नस्ती - एस.डी. ३